पोलीस भरती पूर्व परीक्षा प्रशिक्षण योजना या योजनेंतर्गत खाजगी प्रशिक्षण संस्थांना निधी उपलब्ध करून देण्याबाबत . सन २०१८-१९.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्र. पोभप्र-२०१८/प्र.क्र.५२/का-९
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ४ नोव्हेंबर, २०१९.

वाचा :- १) शासन निर्णय क्र अविवि २००९ /प्र.क्र. १८८/०९/कार्यासन १,दि. २७ जुलै,२००९
२)शासन निर्णय क्र. अविवि २००९/ प्र.क्र १८८/०९/कार्यासन १,दि.२९ऑगस्ट,२००९
३) शासन निर्णय क्रमांक: पोभप्र २०१८/प्र.क्र.५२/का-९, दिनांक १ सप्टेंबर, २०१८.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग- अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/-अर्थ ३,दि.०८ जुलै,२०१९.
५) शासन निर्णय क्र.अविवि २०१९/ प्र.क्र. ३५/कार्यासन ७, दि.२५/१०/२०१९

प्रस्तावना :-

राज्यातील अल्पसंख्याक समुहातील उमेदवारांचे पोलिस सेवेतील भरतीच्या प्रमाणात वाढ व्हावी या उददेशाने संदर्भ क्र १ च्या शासन निर्णय दि. २७ जुलै २००९, अन्वये पोलिस भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण योजना राबविण्यात येत आहे. सदर योजना सन २०१७-१८ पर्यंत महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगामार्फत राबविण्यात येत होती. तथापी, संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णय दि.१.९.२०१८ अन्वये सदर योजना राज्य शासनामार्फत राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सन २०१८-१९ या वर्षामध्ये सदर योजना शासनामार्फत खाजगी प्रशिक्षण संस्थांची निवड करुन राबविण्यात आली आहे. ज्या प्रशिक्षण संस्थांनी दोन महिन्याचे (६० दिवस) यशस्वीरीत्या प्रशिक्षण पूर्ण केले अशा प्रशिक्षण संस्थांना शासन निर्णय दि. २७ जुलै २००९, मधील विहित केलेल्या तरतूदीनुसार अनुदान वितरित करण्याचा प्रस्ताव संबंतधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्यामार्फत प्राप्त झाला आहे.त्यानुसार शासन निर्णय, दि.२७ जुलै,२००९ मधील तरतुदीनुसार आवश्यक कागदपत्राची पुर्तता करणाऱ्या प्रशिक्षण संस्थांना प्रशिक्षणाच्या सुरुवातीस ५० टक्के तसेच प्रशिक्षण पूर्ण केल्या नंतर १०० टक्के या प्रमाणात अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

पोलीस भरतीपूर्व परीक्षा प्रशिक्षण योजनेच्या अंमलबजावणीसाठीसन २०१९-२० या आर्थिक वर्षात संदर्भ क्र.५ येथील नमुद दिनांक २५ ऑक्टोंबर,२०१९ च्या शासन निर्णयान्वये रु.१.५० कोटी इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे. संदर्भ क्र.४ च्या शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ८ , जुलै,२०१९ च्या मार्गदर्शक सूचनांनुसार अर्थसंकल्पित निधीच्या ६० टक्के निधी माहे एप्रिल, २०१९ ते डिसेंबर, २०१९ पर्यंत वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत रुपये दिड कोटी पैकी ६० टक्केच्या प्रमाणात रुपये ९०.०० लक्ष निधी वितरणास उपलब्ध आहे. सदर उपलब्ध निधीमधून शासन निर्णय, दि. २७ जुलै,२००९ मधील अटी व शर्तीची पूर्तता करणाऱ्या संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त प्रस्तावानुसार खालील प्रशिक्षण संस्थांना सन २०१८-१९ या वर्षामध्ये दिलेल्या प्रशिक्षणाकरिता अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | संस्थेच नाव | प्रशिक्षण दिलेले विदयार्थी संख्या | अनुदानाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | लातूर | चैतन्य बहूउददेशीय सेवाभावी महिला मंडळ, लातूर | ४० | रु.२,६२,०००/- |
| २. | अमरावती | श्री. हनुमान व्यायाम प्रसारक मंडळ, अमरावती | ७१ | रु.४,१८,५५०/- |
| ३. | गडचिरोली | कल्पतरु बहूउददेशीय संस्था, गडचिरोली | २८ | रु.२,०५,६००/- |
| ४. | हिंगोली | कै. ग्यानबाराव शिरसाठ बहूउददेशीय सेवाभावी संस्था, हिंगोली | ९१ | रु.५,१९,५५०/- |
| ५. | यवतमाळ | राष्ट्रिय सैनिक संस्था राधाकृष्ण नगरी, यवतमाळ | ५२ | रु.३,२२,६००/- |
| ६. | बीड | आझाद हिंद बहूउददेशीय सेवाभावी संस्था, बीड | ४७ | रु.३,०४,४००/- |
| ७. | नांदेड | विवेकानंद बहूउददेशीय शिक्षण क्रिडा सांस्कृतीक व्यायाम प्रसारक मंडळ, नांदेड | ७३ | रु.४,२०,२९५/- |
| ८. | औरंगाबाद | प्रबोधन बहूउददेशीय संस्था, औरंगाबाद | १०० | रु.५,८०,०००/- |
| ९. | जालना | अंजूमन इशात-ए-तालीम, जालना | १०० | रु.३,४०,०००/- (५०%) |
| १०. | जळगाव | दर्जी बहूउददेशीय संस्था, जळगाव | १०० | रु.३,५५,०००/- (५०%) |
| ११. | चंद्रपूर | साईबाबा शिक्षण बहूउददेशीय संस्था, चंद्रपूर | १०० | रु.५,६५,०००/- |
| १२. | नागपूर | प्रिमियर ॲकडमी सोसायटी, नागपूर | १०० | रु.५,५५,४९०/- |
| | | **एकूण** | | **रु.४८,४८,४८५/-** |
| | | **अक्षरी** | **रुपये अठठेचाळीस लक्ष अठठेचाळीस हजार पंच्याऐंशी फक्त** | |

२. उपरोक्त प्रमाणे मंजूर अनुदान संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांना स्वाधीन करण्यात येत आहे. याबाबत संबंधित जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पहातील.

३. उपरोक्त मंजूर अनुदानापैकी जिल्हाधिकारी यांनी प्रशिक्षण संस्थेस शिक्षकाचे मानधन प्रती शिक्षक प्रती महिना रु. १५,००० (दोन शिक्षक अनुज्ञेय),वाचन साहित्य रु.३०० प्रती विदयार्थी, अल्प उपहार प्रती विदयार्थी रु.१५ प्रती व गणवेश साहित्य रु.१००० प्रती विदयार्थी या प्रमाणात अनुदान वितरित करावे. तसेच,प्रशिक्षणार्थी विद्यार्थ्यांना प्रति विद्यार्थी विद्यावेतन रु. १,५००/- प्रती माहिना याप्रमाणात संबंधीत विद्यार्थ्याच्या बँक खात्यात जमा करावे. अपवादात्मक परिस्थितीत जर एखाद्या संस्थेने विद्यार्थ्याचे विद्यावेतन स्वखर्चाने अदा केले असेल तर अशा परिस्थितीत विद्यावेतन अदा केल्याचे पुरावे (पावती,बँकेचे कागदपत्र )जमा करुन सदर विद्यावेतन संस्थेने संबंधित विद्यार्थ्यांना अदा केले याची खातरजमा केल्यावरच विद्यावेतनाची रक्कम संबंधित संस्थेस अदा करावी.

४. याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी यांनी सादर करावीत. तसेच, संबंधित प्रशिक्षण संस्थेने सदर प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण केला नसल्याचे निदर्शनास आल्यास, संस्थेस वितरित केलेले अनुदान वसूल करण्यात येईल.तसेच, संस्थेने मध्येच प्रशिक्षण बंद केल्याचे निदर्शनास आल्यास, प्रशिक्षणाचे दिवस वजा करता उर्वरित रक्कम संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च मागणी क्र. मागणी क्र. झेड ई ०१, २२३५-सामाजिक सुरक्षा व ल्याण०२ समाज कल्याण १०७ स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान ०१ अल्पसंख्याकांना सहाय्यक अनुदान (०१) (३२) पोलिस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण वर्ग योजनेकरीता विविध संस्थांना सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ सी २७९) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ ला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र .विअप्र -२०१३ /प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या दिनांक ८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकांतील व त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१७५७४६२५१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Dadasaheb Andhare

Digitally signed by Prashant Dadasaheb Andhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, cn=Prashant Dadasaheb Andhare
Date: 2019.11.04 18:02:29 +05'30'

**( प्र.दा.अंधारे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१.मा.राज्यपालांचे सचिव
२.मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३.मा. मंत्री / मा.राज्यमंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव,
४.महालेखापाल , १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, (प्रसिध्दीसाठी)
६.जिल्हाधिकारी,लातूर,अमरावती,गडचिरोली,हिंगोली,यवतमाळ,बीड,नांदेड,औरंगाबाद जालना, जळगाव,चंद्रपूर आणि नागपूर,
७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
९.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी कार्यासन-७ / २ (रोखशाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई.
११.निवडनस्ती(कार्यासन-९)